**बी.ए.एम.एस. अभ्यासक्रम महाविद्यालयाला मान्यता देण्याबाबत.**

श्रीयश प्रतिष्ठाण, छत्रपती संभाजीनगर संचलित श्रीयश आयुर्वेदीक कॉलेज आणि हॉस्पीटल रिसर्च सेंटर, गट नं. २५८, बीड बायपास रोड, नवीन एसआरपीएफ कॅम्प, सातारा परिसर, छत्रपती संभाजीनगर.

**महाराष्ट्र शासन**
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय क्रमांक: एएमसी-२०२३/प्र.क्र.३४३/२३/शिक्षण-१,
९वा मजला, गो.ते. रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई -४००००१.
दिनांक:- २२.०८.२०२४.

वाचा:- १) शासनाचे समक्रमांकाचे दि.२४.०८.२०२३ रोजीचे ना-हरकत प्रमाणपत्र.
२) भारतीय चिकित्सा पध्दती राष्ट्रीय आयोग, आयुष मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३-३/२०२४/MARB-AY (१६६), दि.१४.०८.२०२४.

प्रस्तावना:-

श्रीयश प्रतिष्ठाण,छत्रपती संभाजीनगर संचलित श्रीयश आयुर्वेदीक कॉलेज आणि हॉस्पीटल रिसर्च सेंटर, गट नं. २५८, बीड बायपास रोड, नवीन एसआरपीएफ कॅम्प, सातारा परिसर, छत्रपती संभाजीनगर या आयुर्वेद महाविद्यालयास बी.ए.एम.एस. अभ्यासक्रमाकरिता संदर्भाधीन पत्र क्रमांक (१) अन्वये १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसाठी ना-हरकत प्रमाणपत्र दिलेले आहे. आता, शैक्षणिक वर्ष २०२४-२५ करिता भारतीय चिकित्सा पध्दती राष्ट्रीय आयोग, आयुष मंत्रालय, नवी दिल्ली यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (२) अन्वये १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसाठी संस्थेच्या सदर महाविद्यालयास बी.ए.एम.एस. अभ्यासक्रमाकरिता मान्यता दिलेली आहे. सदर बाब विचारात घेता, शैक्षणिक वर्ष २०२४-२५ साठी सदर संस्थेस आयुर्वेद महाविद्यालयात बी.ए.एम.एस. अभ्यासक्रम सुरू करण्याकरिता परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

श्रीयश प्रतिष्ठाण,छत्रपती संभाजीनगर संचलित श्रीयश आयुर्वेदीक कॉलेज आणि हॉस्पीटल रिसर्च सेंटर, गट नं. २५८, बीड बायपास रोड, नवीन एसआरपीएफ कॅम्प, सातारा परिसर, छत्रपती संभाजीनगर या आयुर्वेद महाविद्यालयास शैक्षणिक वर्ष २०२४-२५ साठी बी.ए.एम.एस. अभ्यासक्रम सुरू करण्याकरिता भारतीय चिकित्सा पध्दती राष्ट्रीय आयोग, आयुष मंत्रालय, नवी दिल्ली यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (२) अन्वये १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसाठी मान्यता (LoP) दिली आहे. त्यानुषंगाने सदर आयुर्वेद महाविद्यालयास शैक्षणिक वर्ष २०२४-२५ साठी १०० विद्यार्थी प्रवेश

क्षमतेसह बी.ए.एम.एस. अभ्यासक्रम सुरू करण्याकरिता पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून परवानगी देण्यात येत आहे.

<u>अटी व शर्ती</u>:-

१. श्रीयश प्रतिष्ठाण, छत्रपती संभाजीनगर संचलित श्रीयश आयुर्वेदीक कॉलेज आणि हॉस्पीटल रिसर्च सेंटर, गट नं. २५८, बीड बायपास रोड, नवीन एसआरपीएफ कॅम्प, सातारा परिसर, छत्रपती संभाजीनगर या आयुर्वेद महाविद्यालयातील बी.ए.एम.एस. अभ्यासक्रमासाठीची विद्यार्थी प्रवेश क्षमता भारतीय चिकित्सा पध्दती राष्ट्रीय आयोग, आयुष मंत्रालय, नवी दिल्ली यांनी निर्धारित केल्यानुसार १०० एवढी राहील.

२. राज्य शासन/केंद्र शासन/मा.सर्वोच्च न्यायालय अथवा मा.उच्च न्यायालय यांनी वेळोवेळी दिलेल्या आदेशानुसार सदर अभ्यासक्रमाच्या प्रवेशाकरिता निश्चित करण्यात आलेली कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी.

३. शासकीय नियम/अधिनियम/शासन निर्णय तसेच मा.सर्वोच्च न्यायालय व मा.उच्च न्यायालय यांनी वेळोवेळी दिलेल्या निर्णयानुसार शैक्षणिक शुल्कासाठी जी कार्यपध्दती अनुसरणे वेळोवेळी भाग असेल, त्याप्रमाणे शैक्षणिक शुल्क निश्चित करण्यात यावे.

४. केंद्र शासन, केंद्रीय भारतीय चिकित्सा परिषद (भारतीय चिकित्सा पध्दती राष्ट्रीय आयोग), नवी दिल्ली व राज्य शासन यांनी आयुर्वेद अभ्यासक्रमाबाबत वेळोवेळी विहीत केलेल्या नियमांचे व मानकांचे पालन करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

५. महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्युशन्स (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ (महाराष्ट्र ॲक्ट १९८८ चा VI) मधील तरतुदींचे संस्थेने काटेकोरपणे पालन करणे आवश्यक आहे.

६. सदरहू संस्थेस कायम विनाअनुदान तत्वावर मान्यता देण्यात आली आहे. त्यामुळे संस्था आवर्ती/अनावर्ती स्वरुपाच्या खर्चासाठी अनुदानाची मागणी शासनाकडे करणार नाही.

७. शासकीय आयुर्वेद किंवा तत्सम महाविद्यालयातील कोणत्याही अध्यापकास तो सेवानिवृत्त होईपर्यंत किंवा नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त होईपर्यंत संस्थेमध्ये नोकरी देता येणार नाही किंवा त्याच्या सेवा संस्थेस वापरता येणार नाहीत.

८. संस्थेने कोणत्याही परिस्थितीत शासनाने मान्य केलेल्या विद्यार्थी प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त विद्यार्थी प्रवेशित करु नयेत.

९. केंद्र शासनाने दिलेली परवानगी ही सन २०२४-२५ वर्षाकरिता प्रवेशित होणारे विद्यार्थी अभ्यासक्रमाच्या अंतिम वर्षामध्ये दाखल होईपर्यंत असून संस्थेने त्यानुसार पुढील वर्षाचे विद्यार्थी प्रवेश करण्यापूर्वी केंद्र शासनाच्या तसेच त्या आधारे राज्य शासनाच्या परवानगीचे नुतनीकरण करुन घेणे बंधनकारक राहील.

१०. संस्थेने गुणवत्तेवर आधारित प्रवेश केलेल्या विद्यार्थ्यांच्या याद्यांना प्रवेश नियामक प्राधिकरण, मुंबई यांचेकडून मंजूर करुन घेणे व या अभ्यासक्रमासाठी आकारण्यात येणाऱ्या शुल्काची निश्चिती शुल्क नियामक प्राधिकरण यांच्याकडुन करुन घेणे संस्थेवर बंधनकारक राहील.

११. सदर आदेश केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक (२) अन्वये दिलेली मान्यता विचारात घेऊन, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ अधिनियम, १९९८ मधील कलम ६४ नुसार शासनास प्रदत्त असलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२२१०३२३००८१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT TUKARAM SASULKAR

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=09df106c443b4977e7463338fa58f736fdb4fe137863b178345a5ead34dbfb12, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=71214F99804ABAAE1EA28D5F794C1BA337889880D0C567C29D0259343409 56DF, cn=AJIT TUKARAM SASULKAR Date: 2024.08.22 16:08:30 +05'30'

(अजित सासुलकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राज भवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, ८ व ९ वा मजला, न्यु एक्सेलसिअर बिल्डींग, ए.के.नायक मार्ग, फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
७) सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण, शासकीय तंत्रज्ञान इमारत, ३०५, ३रा मजला, ४९, खेरवाडी, बांद्रा (पूर्व), मुंबई - ४०० ०५१.
८) आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, एक्सेलसिअर बिल्डींग, ए.के.नायक मार्ग, फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
९) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि आयुष, मुंबई.
१०) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, मुंबई.
११) संचालक, आयुष संचालनालय, मुंबई.
१२) कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक.
१३) सर्व सह सचिव/उप सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) अधिष्ठाता, सर्व शासकीय आयुर्वेद महाविद्यालये.
१५) अधिष्ठाता/प्राचार्य, श्रीयश प्रतिष्ठाण,छत्रपती संभाजीनगर
१६) निवडनस्ती (शिक्षण-१).